**देशी/विदेशी मद्य निर्मितीसाठी असलेल्या मद्यार्क कोटा आणि अतिरिक्त मद्यार्क कोटा नियतन पद्धतीमध्ये सुलभता आणण्याबाबत......**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन निर्णय क्र.एमआयएस १२२१/प्र.क्र.२३५/राउशु-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १४ जानेवारी, २०२२

**संदर्भ :** आयुक्त, राउशु यांचे क्रमांक मद्यार्क कोटा नियतन/११२०२१/२१-२२/५-ब, दि. ०९ डिसेंबर, २०२१ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्यातील देशी/विदेशी मद्य उत्पादक घटकांना मद्य निर्मितीसाठी राज्य उत्पादन शुल्क विभागामार्फत मद्यार्क कोटा मंजुर करण्यात येतो. मद्यार्काच्या पुरवठयाअभावी मद्य निर्माणी बंद पडून शासनाच्या महसुलावर अनिष्ट परिणाम होऊ नये यासाठी मद्य उत्पादकांनी गेल्या ५ वर्षात वापरलेला सर्वोच्च कोटा हा त्यांची स्थापित क्षमता गृहित धरुन त्यांना मद्यार्क कोटयाचे नियतन करण्यात येते. त्याचप्रमाणे, घटकाने स्थापित क्षमतेपेक्षा अधिक मद्यार्काची मागणी केली तर अतिरिक्त मद्यार्क हा तदर्थ (Adhoc) मद्यार्क कोटा शासनाच्या पूर्वमान्यतेने संबंधीत घटकास मंजूर करण्यात येतो. अशा प्रकारे अतिरिक्त मद्यार्क कोटा मंजुर करण्यासाठी शासन मान्यता घेण्याच्या प्रक्रियेत होणारा वेळेचा अपव्यय व महसुलाचे नुकसान टाळण्याच्या दृष्टीने तसेच, मद्य निर्माणींना उत्पादन प्रक्रिया आणि व्यवसाय सुलभतेच्या (EoDB-Ease of doing Business) दृष्टीने या प्रक्रियेमध्ये सुलभता आणणे आवश्यक झाले आहे. याअनुषंगाने, देशी/विदेशी मद्य निर्मितीसाठी मद्यार्क कोटा नियतन प्रक्रियेत सुलभता आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील देशी/विदेशी मद्य उत्पादक घटकांना मद्य निर्मितीसाठी शासनाच्या पूर्वमान्यतेने अतिरिक्त मद्यार्क कोटा मंजुर करताना होणारा वेळेचा अपव्यय आणि महसूलाचे नुकसान टाळण्यासाठी तसेच, मद्य निर्माणींना उत्पादन प्रक्रियेमध्ये सुलभता आणण्यासाठी आणि व्यवसाय सुलभतेच्या (EoDB-Ease of doing Business) दृष्टीने आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी केलेल्या शिफारशीनुसार खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

१. देशी/विदेशी मद्य निर्मितीसाठी असलेली मद्यार्क कोटा आणि अतिरिक्त मद्यार्क कोटा नियतन करण्याची पध्दत रद्द करण्यात येत आहे.

२. देशी/विदेशी मद्य निर्मिती घटकाने वित्तीय वर्षाच्या सुरूवातीस भरलेल्या अनुज्ञप्ती शुल्काच्या प्रमाणात त्यांना आपोआप मद्यार्क कोटा उपलब्ध करून देण्यात यावा. तसेच, त्याच वित्तीय वर्षाच्या कालावधीत घटकाने अतिरिक्त अनुज्ञप्ती शुल्क भरल्यास त्या प्रमाणात वाढीव/अतिरिक्त मद्यार्क परिमाण घटकास आपोआप मंजूर होईल.

३. देशी/विदेशी मद्य निर्माणींकडून वित्तीय वर्षाच्या सुरूवातीस तसेच, तदनंतर वेळोवेळी भरणा केलेल्या अतिरिक्त अनुज्ञप्ती शुल्काच्या अनुषंगाने त्यांना मंजूर होणा-या मद्यार्क कोट्याची नोंद वेळोवेळी SCM प्रणालीत होईल, याबाबत आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर निर्णय तात्काळ प्रभावाने लागू करण्यात येत आहे.

**२.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०११४१५५४३२७७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUDHAKAR SHAHAJI YADAV

Digitally signed by SUDHAKAR SHAHAJI YADAV
DN: CN = SUDHAKAR SHAHAJI YADAV, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = HOME DEPARTMENT
Date: 2022.01.14 15:56:24 +05'30'

**( सु. श. यादव )**
**अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन, मुंबई.
३. मा.मंत्री/राज्यमंत्री, राज्य उत्पादन शुल्क, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई - ३२.
५. प्रधान सचिव (राउशु), गृह विभाग, मंत्रालय,मुंबई - ३२.
६. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई -२३.
७. सर्व जिल्हाधिकारी
८. सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क.
९. सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क.
१०. राउशु-२ (संग्रहार्थ).